दि.७ मार्च ते २५ मार्च २०१७ या कालावधीत
महा-रेशीम अभियान-२०१७ राबविणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः केंपूयो २०१७/ प्र.क्र.७/ रेशीम कक्ष

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -३२
तारीख: ६ मार्च, २०१७

**वाचा :-**

१) संचालक (रेशीम) यांचे पत्र रे/ कार्या-८/ तुती लागवड अभियान/ १६-१७ दि.८.२.२०१७

**प्रस्तावना :-**

रेशीम उद्योग हा कृषि व वनसंपत्तीवर आधारीत रोजगाराची प्रंचड क्षमता असलेला उद्योग आहे. तसेच या उद्योगाच्या माध्यमातून ग्रामीण भागातील जनतेचा आर्थिकस्तर व जीवनमान उंचावण्यास मदत करणारा हा उद्योग आहे. महाराष्ट्रातील कृषि हवामान व शेतजमीन तुती लागवडीस व रेशीम कोष निर्मितीसाठी अनुकुल आहे. राज्यातील हवामान तसेच ग्रामिण भागात रोजगार निर्मिती व उच्च मूल्ल्यांकित पिक रचना इ. सर्व बाबीचा विचार केल्यास रेशीम उत्पादन करण्यास राज्यात भरपूर वाव आहे. सध्या वातावरणाच्या लहरीपणामुळे शेतीमध्ये होणारे आर्थिक नुकसान टाळण्यासाठी हमखास व नियमित उत्पन्न मिळविण्यासाठी रेशीम उद्योगाची शेतक-यांना मदत होऊ शकते.

महाराष्ट्र राज्याचा कृषि विकास दर वृध्दी करण्याच्या दृष्टीने रेशीम उद्योगाचा महत्वाचा वाटा असणार आहे. राज्यात केंद्र व राज्य शासनाच्या विविध योजनांच्या माध्यमातून रेशीम योजना राबविण्यात येत आहे. त्यापासून लाभार्थ्यांना शाश्वत उत्पन्न मिळत आहे. परंतु या उद्योगापासून शेतक-यांना / लाभार्थ्यांना मिळणा-या लाभाची परिपूर्ण माहिती नसल्याने राज्यातील शेतकरी या उद्योगाकडे अद्याप मोठया प्रमाणात वळलेले दिसून येत नाहीत. शेतकरी / लाभार्थी यांच्या उत्पन्नात वाढ व्हावी तसेच शासनाकडून मिळणा-या सहाय्याची त्यांना माहिती व्हावी याकरीता शासनाच्या या योजनेची व्यापक प्रसिध्दी होऊन जनजागृती व्हावी व या योजनेद्वारे मिळणा-या हमखास उत्पन्नाची जनेतेला माहिती व्हावी याकरीता दि. ७ मार्च ते २५ मार्च २०१७ या कालावधीत **"महा-रेशीम अभियान-२०१७"** राबविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

राज्यातील रेशीम शेतीचे महत्व व त्यातून मिळणा-या हमखास व शाश्वत उत्पन्नाची शेतक-यांना माहिती व्हावी व याकरीता प्रचार व प्रसिध्दी करण्यासाठी तसेच या अनुषंगाने रेशीम शेतीसाठी नोंदणी करण्यासाठी दि.७ मार्च ते २५ मार्च २०१७ या कालावधीत राज्यात **"महा-रेशीम अभियान-२०१७"** राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**२.उद्देश :-**

१. केंद्र व राज्य शासनाच्या रेशीम विषयक विविध योजना शेतक-यापर्यंत पोहोचविणे.
२. रेशीम योजनेच्या माध्यमातून शेतक-यांना शाश्वत्त उत्पन्नाचे साधन निर्माण करून उत्पन्नात वाढ करणे.
३. रेशीम योजनेची फलश्रुती व यशस्वीता याबाबत व्यापक प्रसिध्दी देणे
४. रेशीम उद्योगाचा समुह आधारीत ( Soil to Silk ) विकास करणे.

५. तुती व टसर रेशीम उद्योगात महिलांचा सहभाग वाढविणे.
६. सामाजिक वनिकरण विभागामार्फत शेतक-यांच्या बांधावर तुती वृक्षाची लागवड करून पर्यावरणाचा समतोल राखण्यास मदत करुन शेतक-याच्या उत्पन्नात वाढ करणे.
७. वन विभागाच्या सहाय्याने वनक्षेत्रात ऐन व अर्जुन वृक्षाच्या लागवडीमध्ये वाढ करणे.
८. रेशीम उत्पादक समुहांना वार्षिक लागवड क्षेत्राचे लक्षांक निश्चित करून येत्या वर्षात लक्षांक पुर्तता करणे.
९. नाविन्यपूर्ण रेशीम तंत्रज्ञान शेतक-यापर्यंत पोहचवणे.

**३. समित्या :-**

राज्यात रेशीम अभियान यशस्वीपणे राबविण्यासाठी पुढीलप्रमाणे समित्या गठीत करण्यास शासन मान्यता देत आहे. या समितीच्या माध्यमातून रेशीम अभियान राबविण्यात यावे.

| | | |
|---|---|---|
| अ) **राज्य स्तरीय समिती** :- | प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) | अध्यक्ष |
| | प्रधान सचिव (वने) | सदस्य |
| | प्रधान सचिव (कृषि) | सदस्य |
| | सचिव (रोहयो) | सदस्य |
| | प्रधान मुख्य वनसंरक्षक | सदस्य |
| | आयुक्त (मनरेगा) | सदस्य |
| | संचालक (रेशीम) | सदस्य |
| | प्रकल्प संचालक (बार्टी) समतादूत कक्ष | सदस्य |
| | उपसचिव (वस्त्रोद्योग) | सदस्य सचिव |
| आ) **विभागस्तरीय समिती** :- | विभागीय आयुक्त | अध्यक्ष |
| | मुख्य वनसंरक्षक | सदस्य |
| | सह संचालक (कृषि) | सदस्य |
| | उप आयुक्त (रोहयो) | सदस्य |
| | सहायक संचालक (रेशीम) | सदस्य सचिव |
| इ) **जिल्हास्तरीय समिती** :- | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| | उप वनसंरक्षक | सदस्य |
| | उप जिल्हाधिकारी -रोहयो | सदस्य |
| | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (मनरेगा, जि.प.) | सदस्य |
| | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| | जिल्हा रेशीम विकास अधिकारी | सदस्य सचिव |
| ई) **तालुकास्तरीय समिती**:- | तहसिलदार | अध्यक्ष |
| | तालुका कृषि अधिकारी | सदस्य |
| | गट विकास अधिकारी | सदस्य |
| | रेशीम वरिष्ठ तांत्रिक सहायक/वरिष्ठ क्षेत्र सहायक/ क्षेत्र सहायक | सदस्य सचिव |

**४. तात्रिक गट व नियोजन :-**

रेशीम अभियान राबविण्याकरीता संचालक (रेशीम) यांनी त्यांच्यास्तरावर तांत्रिक गटाची स्थापना करावी. या तांत्रिक गटाने रेशीम अभियान कार्यक्रमाच्या पूर्व तयारीसाठी सुक्ष्म नियोजन करावे. नियोजन करताना गाव हा घटक मानावा.

**५. सदरचा आराखडा तयार करण्याकरीता सर्वसाधारण सुचना पुढीलप्रमाणे राहतील :-**

- ✓ तांत्रिक गटाने रेशीम अभियानाकरीता लागणारे सर्व साहित्य व सामुग्री उदा. बॅनर, बोर्ड, पॉम्पलेटस, माहितीपत्रके , चित्रफित तसेच प्रर्दशनासाठी आवश्यक साहित्य इ. समावेश करताना एक सारखेपणा राहील असे नियोजन करावे. याबाबत संचालक (रेशीम) यांनी नियंत्रण ठेवावे.
- ✓ प्रत्येक जिल्हयाचा एक रेशीम रथ तयार करुन रेशीम अभियान राबविण्यात यावे. या रेशीम रथाकरीता लागणारी माहिती तांत्रिक गटाने शिफारस केल्याप्रमाणे एक सारखी राहील याची सर्व संबधितांनी दक्षता घ्यावी.
- ✓ जिल्हयातील रेशीम रथ तांत्रिक गटाने शिफारस केल्याप्रमाणे तयार करण्याची जबाबदारी संबधित जिल्हयातील रेशीम विकास अधिका-यांची राहील.
- ✓ तांत्रिक गटाने रेशीम अभियान सुरू करण्यापूर्वी जिल्हयामधील विविध समुहातील गावांमध्ये बैठक/ सभा/ मेळावा यांच्या तारीखनिहाय वेळा निश्चित करून अभियानाचे सुक्ष्म नियोजन करावे.
- ✓ या समुहनिहाय व गावनिहाय कार्यक्रमाचा आराखडा तालुकास्तरीय व जिल्हास्तरीय समितीकडे अभियान सुरू होण्यापूर्वी पाठविण्याची दक्षता घेण्यात यावी.
- ✓ या कार्यक्रम आराखडयाप्रमाणे रेशीम अभियान राबविण्याची जबाबदारी जिल्हास्तरीय व तालुकास्तरीय समितीची राहील.
- ✓ सर्व संबधीत समित्यांनी बैठका आयोजित करुन रेशीम अभियान कार्यक्रम यशस्वीपणे राबविण्याची कार्यवाही करावी.

**६. जिल्हास्तरीय समितीची कार्यवाही :-**

मुंबई व मुंबईउपनगर जिल्हा वगळून राज्यातील इतर सर्व जिल्हयात जिल्हाधिकारी , मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प व जिल्हयातील लोकप्रतिनिधी यांचेशी रेशीम विकास अधिकारी यांनी सपर्क साधून दि.९ मार्च २०१७ रोजी सर्व जिल्ह्यांमध्ये महा-रेशीम अभियानाची सुरुवात संबंधित जिल्ह्याच्या जिल्हाधिका-यांच्या हस्ते करण्यात यावी.त्यासाठी सर्व जिल्ह्यांच्या ठिकाणी कार्यक्रमाचे आयोजन करावे. या कार्यक्रमास प्रगतीशिल शेतकरी, रेशीम उद्योजक, शेतीनिष्ठ व पुरस्कारप्राप्त शेतकरी, यांना आमंत्रित करण्यात येवून मार्गदर्शन करण्यात यावे.

**७. तालुकास्तरीय समितीची कार्यवाही :-**

- गावपातळीवरील बैठक आयोजनापूर्वी सर्व संबधिताना पूर्वसुचना देण्याची जबाबदारी संबधीत कार्यक्षेत्रातील रेशीम तांत्रिक अधिकारी/ कर्मचा-यांची राहील.
- गावपातळीवरील कार्यक्रमास जि.प.सदस्य, प.स.सदस्य , समुहातील सरपंच ,ग्रामस्थ, प्रगतीशिल शेतकरी, शेतीनिष्ठ व शेतीशी सबंधीत पुरस्कारप्राप्त शेतकरी, तसेच रेशीम उत्पादक शेतकरी, रेशीम मित्र इ. आमंत्रित करण्याची जबाबदारी संबधित जिल्हयाचे अधिकारी व तांत्रिक कर्मचारी यांची राहील.

- गावपातळीवरील कार्यक्रमामध्ये रेशीम प्रर्दशन आयेजित करणे, चित्रफित , पॉम्पलेटस व हस्तपत्रिका वाटप करणे इ. बाबतची जबाबदारी संबधित जिल्हयाचे रेशीम विकास अधिकारी व रेशीम विभागातील तांत्रिक कर्मचारी यांची राहील.
- केंद्र व राज्य शासनाच्या विविध योजनेबाबत मार्गदर्शन करणे.
- रेशीम शेतीबाबत मार्गदर्शन करणे.
- रेशीम कोषाचे खुल्या बाजारपेठेतील दैंनदिन दराबाबत माहिती देणे.
- इतर पिकाच्या तुलनेत रेशीम उद्योगाचे अर्थशास्त्र समजावून सांगून रेशीम उद्योगाकडे शेतक-यांना आकर्षित करून पात्र लाभार्थ्यांचे नांव नोंदणी करणे.
- ऑनलाईन नोंदणीबाबत मार्गदर्शन करणे, नोंदणी करण्याकरीता आवश्यक कागदपत्राची माहिती देणे.
- समुह पध्दतीने रेशीम विकासाबाबत मार्गदर्शन करणे.
- यशस्वी रेशीम उद्योजकाचे मार्गदर्शनपर व्याख्यानाचे आयोजन करणे.
- शेतक-यांना तांत्रिक मार्गदर्शनाच्यावेळी विविध सादरीकरणाच्या सी.डी.डी.व्ही.डी. यशोगाथा इ.चा वापर करणे.
- प्रत्येक गावामध्ये बैठकीसाठी किमान एक रेशीम तज्ञ, प्रगतीशील रेशीम शेतकरी , कृषि विभागाचे अधिकारी यापैकी किमान एक उपस्थित राहील अशाप्रकारे नियोजन करणे.

८. **अभियानातील इतर बाबी** :-

- बैठकीच्या वेळीच एकाच गावात २५ पेक्षा जास्त शेतकरी नोंदणी करण्यास ईच्छूक असल्यास मग्रारोहयोजनेतील तरतूदी विचारात घेवून विशेष ग्रामसभा बोलावून पात्र रेशीम लाभार्थ्यांच्या प्रस्तावास मान्यता देण्याची कार्यवाही ग्रामपंचायतीने करावी.जर बैठकीच्या वेळी २५ पेक्षा कमी शेतकरी नोंदणी करण्यास ईच्छूक असल्यास अशावेळी मग्रारोहयोजनेतील तरतूदी विचारात घेवून नेहमीच्या पद्धती नुसार प्रस्ताव ग्रामसभेने मंजुर करावा.
- रेशीम अभियानामध्ये नोंदणी केलेल्या रेशीम लाभार्थ्यांना तुती लागवडीकरीता आवश्यक रोपांचा पुरवठा करण्याचे नियोजन व कार्यवाही संबधित जिल्हयातील रेशीम विकास अधिकारी यांनी करावी. व याबाबत संचालक( रेशीम ) यांनी नियंत्रण करावे.
- तुती रोपाकरीता शासकीय रेशीम फार्म, कृषि विज्ञान केंद्र , कृषि विद्यापिठे, शासकीय रोपवाटीका , सामाजिक वनीकरण विभागाच्या रोपवाटीका इ. ठिकाणी तुती रोपे उपलब्धतेबाबत नियोजन करण्यात यावे तसेच पात्र रेशीम लाभार्थ्यांना दर्जेदार रोपाची निर्मिती स्वत:च्या क्षेत्रावर तयार करण्याचीसुध्दा मुभा दयावी.
- तुती लागवडीचा कालावधी जून ते सप्टेबर अखेर पर्यंत राहील. या कालावधीत तुती लागवड होईल याची सर्व संबधित क्षेत्रीय अधिकारी व कर्मचारी यांनी दक्षता घेणे आवश्यक राहील.
- लागवडीच्या कालावधीत तुती लागवडीकरीता रोपे उपलब्ध व्हावे म्हणून शेतकरीनिहाय सुक्ष्म नियोजन करण्याची जबाबदारी क्षेत्रीय अधिकारी व रेशीम संचालनालयाची राहील.

- समुहातील लक्षांकांनुसार व नोंदणी झालेल्या लाभार्थ्यांना तुती रोपाद्वारे शतप्रतिशत तुती लागवड व्हावी म्हणून रोपाचे नियोजन करण्याची जबाबदारी संबधित जिल्हा रेशीम विकास अधिकारी व रेशीम संचालनालयाची राहील.
- तुती लागवड सुरू करण्यापूर्वी रेशीम अभियानामध्ये नोंदविण्यात आलेल्या पात्र लाभार्थ्यांच्या प्रस्तावास पुढील तक्तयात नमूद केल्याप्रमाणे मान्यता प्रदान करणे आवश्यक राहील.

| अ.क्र. | कालावधी | कार्यवाहीची बाब | कार्यान्वयन यंत्रणा |
| --- | --- | --- | --- |
| १ | १ मे | ग्रामसभा ठराव | ग्रामपंचायत |
| २ | ५ मे | पात्र लाभार्थ्याची यादी तहसिलदार यांचेकडे पाठविणे | ग्रामसेवक |
| ३ | १० मे | तांत्रिक मान्यतेकरीता पात्र लाभार्थ्यांची यादी संबधित जिल्हा रेशीम अधिका-याकडे पाठविणे | तहसिलदार |
| ४ | १५ मे | पात्र लाभार्थ्यांच्या रेशीम प्रकल्पाचे अंदाजपत्रक तयार करून तांत्रिक मान्यता देवून प्रस्ताव प्रशासकिय मान्यतेस्तव तहसिलदार यांचेकडे पाठविणे | रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१/२ |
| ५ | ३० मे | प्रकल्पास प्रशासकिय मान्यता देवून कार्यारंभ आदेश देणे | तहसिलदार |

- टसर क्षेत्रातील लाभार्थ्यांची संख्या विशेषत: महिला लाभार्थ्याच्या ( महिला बचत गट) संख्येत वाढ करण्यासाठी वन विभागाच्या मदतीने अर्जुन व ऐन वृक्षाचे वनपटटे उपलब्ध करून देण्याबाबत संबधित जिल्हा समितीने कार्यवाही करावी.
- वन क्षेत्रामध्ये इतर वृक्षाची लागवडीबरोबर ऐन व अर्जुन वृक्षाची लागवड वाढविण्यासाठी वन विभागाच्या सहाय्याने कार्यक्रमाचे नियोजन करावे.
- ग्रामस्तरावरील वन व्यवस्थापन समितीच्यामार्फत टसर उद्योग वाढीकरीता प्रयत्न करण्यात यावे. तसेच ऐन व अर्जुनवृक्ष संवर्धनाकरीता जनजागृती निर्माण करावी.

**९. संनियत्रण व पर्यवेक्षण :-**

संचालक (रेशीम) यांनी त्यांच्या अधिनस्त कार्यालयातील अधिका-यामार्फत सर्व जिल्हयातील कार्यक्रमांचे संनियंत्रण करावे. जिल्हानिहाय कार्यक्रमाची जबाबदारी संबधित समितीची राहील याबाबत त्यांना अवगत करावे. रेशीम अभियानाचा गावनिहाय कार्यक्रमाचा आराखडा **परिशिष्ट १** नुसार तयार करुन नियोजन करावे.

जिल्हयातील समुहनिहाय व गाव निहाय आयोजित कार्यक्रमाचा दैंनदिन अहवाल **परिशिष्ट २ अ** नुसार क्षेत्रीय कर्मचा-यांनी दुस-या दिवशी सकाळी जिल्हा कार्यालयास सादर करावा. जिल्हा रेशीम अधिका-याने सदर अहवाल सहायक संचालक यांचेकडे त्याच दिवशी सादर करावा. विभागातील सर्व जिल्हयाचे दैंनदिन अहवाल **परिशिष्ट २ ब** मध्ये संकलीत करून सहायक संचालक (रेशीम) यांनी रेशीम संचालनालयास सादर करावेत. रेशीम संचालनालयस्तरावरुन रेशीम अभियान कार्यक्रमाकरीता जिल्हास्तरीय व विभागस्तरीय समन्वयक यांची नियुक्ती करण्यात यावी. या समन्वयक अधिका-यांनी विभागातील व जिल्हयातील कार्यक्रमांना भेटी देवून अहवाल **परिशिष्ठ ३** मध्ये सादर करावा. रेशीम अभियान कालावधीत नविन नोंदणी करणा-या शेतक-यांचा दैनंदिन अहवाल **परिशिष्ठ ४** नुसार सहायक संचालक यांच्यामार्फत रेशीम संचालनायास सादर करावा. रेशीम अभियानाचा दैनंदिन व कार्यपुर्तता अहवाल शासनास विहीत मुदतीत संचालक (रेशीम) यांनी सादर करावा.

**१०.** सदर रेशीम अभियान कार्यक्रमाकरीता विविध मंजूर योजनामधील प्रशिक्षण, मेळावे, प्रचार व प्रसिध्दी या बाबीबरीता उपलब्ध असलेल्या निधीतून विहीत मर्यादेच्या व वित्तीय अधिकार नियमाच्या अधीन राहून खर्च करण्याची जबाबदारी संचालक (रेशीम) यांची राहील.या व्यतिरीक्त निधीची आवश्यकता भासल्यास प्रस्तुत महा-रेशीम अभियान २०१७ करीता आवश्यक तो निधी संचालक (रेशीम) यांना स्वतंत्रपणे उपलब्ध करुन देण्यात येईल.

**११.** प्रस्तुत महा-रेशीम अभियान राबविण्यासाठी डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे अधिपत्या खालील समता दुत प्रस्तुत महा-रेशीम अभियानाचे महत्व शेतक-यांना समजावुन सांगतील तसेच शेतक-यांना तुती लागवडी करीता नोंदणी सह सर्व प्रकारची मदत करतील. त्याकरीता प्रति समता दुत रु.२५००/-इतके मानधन परस्पर समता दुतांना तसेच प्रति समता दुत रु.५००/- व त्यावरील अनुज्ञेय सेवा कर डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना सेवा शुल्क म्हणुन संचालक (रेशीम)यांचे कडुन अदा करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०६१५५१५९१९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anilkumar R Ugale

Digitally signed by Anilkumar R Ugale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1d265dc74c98f72f41f5a1403db16525e09e7de2e336c366de3a32ea2a050a8a, cn=Anilkumar R Ugale
Date: 2017.03.06 15:55:50 +05'30'

**(अनिलकुमार रा. उगले)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
४. सर्व सन्माननीय संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य

५. सर्व सन्माननीय विधानसभा/ विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य
६. प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (कृषि) ,कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव ( महसूल ) महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव (वने) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव (ग्रामविकास) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव (रोहयो) जलसंधारण व रोजगार हमी योजना, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४. प्रधान मुख्य वनसंरक्षक, म.राज्य, नागपूर
१५. आयुक्त , महात्मा गांधी ग्रामिण रोजगार हमी योजना , नागपूर
१६. सर्व जिल्हाधिकारी , महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१८. संचालक (रेशीम) रेशीम संचालनालय, नागपूर
१९. संचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
२०. प्रकल्प संचालक , समता दूत कक्ष , डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
२१. सर्व सहायक संचालक (रेशीम) नागपूर/ अमरावती/ पूणे/ औरंगाबाद
२२.सर्व जिल्हा रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१/२
२३. विधानमंडळ ग्रंथालय, विधानभवन मुंबई
२४. रेशीम कक्ष निवडनस्ती .

*****************

## परिशिष्ट -१

## रेशीम अभियान कार्यक्रमाचा समुहनिहाय नियोजनाचा आराखडा

समुहाचे नाव ------- तालुका------ जिल्हा -------------

| अ.क्र. | दिनांक | गावाचे नाव | कार्यक्रमाचे ठिकाण | वेळ | प्रस्तावित मार्गदर्शक अधिकारी/ प्रगतीशील शेतकरी/ रेशीम मित्र | संपर्क अधिकारी | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | नाव | भ्रमनध्वनी क्रमांक |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | | | | | | |
| | | | | | | | |

## परिशिष्ट -२ अ

## रेशीम अभियान कार्यक्रम

## गावात आयोजित केलेल्या कार्यक्रमाचा तपशिल

१) समुहाचे नाव :- ----------- २) गावाचे नांव ----------३) तालुका -------- ४) जि.--------

५) क्षेत्र सहायक---------------------- सहा यांचे नाव व भ्रमनध्वनी क्रमांक.तां.जे /सहा.क्षे.जे /

६) रेशीम मित्र / प्रगतीशिल रेशीम शेतकरी नांव व भ्रमनध्वनी क्रमांक -----------------------

७) कार्यक्रमाचे ठिकाण ------------------------ वेळ --------------------------

८) उपस्थित शेतकरी संख्या-----------------------------------

९) उपस्थित लोकप्रतिनिधी / पदाधिकारी यांचे नाव --------------------------------

१०) उपस्थित मार्गदर्शक (शास्त्रज्ञ /अधिकारी/ प्रगतीशील शेतकरी/बचत गट/ संस्था प्रतिनिधी) -

| अ.क्र | नाव | पदनाम | विभाग/संस्था | विषय |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |

११) कार्यक्रमाचा तपशिल ----------------------------------------

स्वाक्षरी /- स्वाक्षरी /-

**प्रगतिशिल रेशीम शेतकरी/ रेशीम मित्र** **क्षेत्र सहायक/ जे.क्षे.सहा/ जे.तां.सहा**

## परिशिष्ट -२ ब

## रेशीम अभियान कार्यक्रमाचा समुहनिहाय दैंनदिन गोषवारा

समुह -------------- तालुका -------------- जि---------- दि.-------------

| अ.क्र. | समुहातील एकूण गावाची संख्या | कार्यक्रम घेतलेले गावे संख्या | उपस्थित शेतकरी संख्या | उपस्थित मार्गदर्शक संख्या | | | उपस्थित लोकप्रतिनिधी / पदाधिकारी संख्या | आयोजित कार्यक्रमाचा संक्षिप्त तपशिल |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | शास्त्रज्ञ | अधिकारी | प्रगतिशील शेतकरी | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| | | | | | | | | |

## परिशिष्ट -३

## रेशीम अभियान समुहनिहाय दैंनदिन अहवाल

समन्वय अधिका-याचे नाव व पदनाम ------------------------

| अ.क्र. | दिनांक | भेट दिलेले गाव / ठिकाण | तालुका व जिल्हा | उपस्थित शेतकरी संख्या | उपस्थित मार्गदर्शक शास्त्रज्ञ/ अधिकारी/ प्रगतीशिल शेतकरी | उपस्थित लोकप्रतिनिधी/ पदाधिकारी | आयोजित कार्यक्रमाचा संक्षिप्त तपशिल |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | | | | | | |

**समन्वयक अधिका-याची स्वाक्षरी/-**

## परिशिष्ट -४

## रेशीम अभियान नोंदणीचा कार्यपुर्तता अहवाल

समुह ------------- तालुका ------------ जि.-----------

| अ.क्र. | दिनांक | कार्यक्रम घेतलेल्या गावाचे नाव | नविन नोंदणीचा तपशिल | |
|---|---|---|---|---|
| | | | शेतक-यांचे नाव | भ्रमनध्वनी क्रमांक |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | | | | |
| | | | | |